**मागणी क्र. सी-०७ २४०६- वनीकरण व वन्यजीवन, १०१, वन संरक्षण, विकास व पुनर्निर्मिती (०१) प्रशासन व संरक्षण (०१) (०१) प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) अंतर्गत (योजनेत्तर) लेखाशिर्षातील ११- देशांतर्गत प्रवास खर्च या अंतर्गत उपलब्ध असणारा निधी १४- भाडेपट्टी व कर या उद्दीष्टाखाली पुनर्वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एफडीएम-२०२२/प्र.क्र.८०/फ-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २२ फेब्रुवारी, २०२३

**वाचा** : १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२(१)/असं/प्र.क्र.०२(भाग-१)/ ७६/२०२२-२३, दि.१८.०७.२०२२ व दि.०९.१२.२०२२.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२.

**प्रस्तावना :-**

सन २०२०-२१ पासून कोव्हिड परिस्थितीमुळे योजनेत्तर योजना अंतर्गत निधीमध्ये मोठया प्रमाणात कपात झाल्यामुळे आवश्यकतेनुसार निधी प्राप्त झाला नाही. त्यामुळे सन २०२१-२२ पासून भाडे तत्वावर असणाऱ्या कार्यालयांचे भाडे प्रलंबित आहे. त्यामुळे शासनास व्याज व दंड यांचा अधिकचा भार सोसावा लागत आहे.

प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांच्या दि.१८.०७.२०२२ व दि.०९.१२.२०२२ रोजीच्या पत्रांन्वये मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), नागपूर यांच्या कार्यालयाचे माहे नोव्हेंबर, २०२१ ते माहे जून, २०२२ पर्यंतचे थकित भाडे, विज बील, पाणी बील दंडनीय व्याज व जी.एस.टी. अदा करण्याकरिता रु.१,९९,१८,७४४/- इतके अनुदान तसेच मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक), पुणे व इतर कार्यालयाचे सन २०१९-२० ते २०२२-२३ या वित्तीय वर्षात मिळकत कराची सेवा शुल्काचे देयकांची प्रलंबित रक्कम व पाणी पट्टी पुरवठाचे थकीत देयक अदा करण्याकरिता रु.३,३२,३३,७१५/- इतके अनुदान असे एकूण रु.५,३१,५२,४५९ /- म्हणजेच रु.५३२.०० लक्ष इतके अनुदान सन २०२२-२३ मुख्य लेखाशिर्ष प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) अंतर्गत १४- भाडेपट्टी व कर या उद्दीष्टासाठी आवश्यक असल्याचे नमूद केले आहे. तसेच त्यासाठी ११- देशांतर्गत प्रवास खर्च या अंतर्गत उपलब्ध असणारा निधी १४- भाडेपट्टी व कर या उद्दीष्टाखाली पुनर्वितरण करून मिळणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

त्या अनुषंगाने प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सन २०२२-२३ मुख्य लेखाशिर्ष प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) ११- देशांतर्गत प्रवास

खर्च या अंतर्गत उपलब्ध असणारा निधी १४- भाडेपट्टी व कर या उद्दीष्टाखाली पुनर्वितरण करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये शासनास सादर केलेला प्रस्ताव तसेच वित्त विभागाने संदर्भ क्र.२ येथील दि.०४.०४.२०२२ रोजीच्या परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना विचारात घेता, सन २०२२-२३ मुख्य लेखाशिर्ष प्रशासन व संरक्षण (२४०६ ००९६) ११- देशांतर्गत प्रवास खर्च या अंतर्गत उपलब्ध असणारा निधी १४- भाडेपट्टी व कर या उद्दीष्टाखाली खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे पुनर्वितरण करण्यास व बीम्स् (BEAMS) प्रणालीवर उपलब्ध केलेल्या अनुदानाच्या मर्यादेत खर्च करण्यास या शासन आदेशान्वये मान्यता देण्यात येत आहे :-

**(रक्कम लाखात)**

| अ. क्र. | मुख्यलेखाशिर्ष | सविस्तर शीर्ष | २०२२-२३ ची अर्थसंकल्पित तरतूद | वितरणासाठी उपलबध करुन दिलेला निधी | पुनर्वितरणा करीता विभागाची मागणी | उपलब्ध अनुदानानुसार पुनर्वितरणाने वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | (२४०६ ००९६) (०१) (०८) वनीकरण व वन्यजीवन,१०१, वन संरक्षण, विकास व पुनर्निमिती (०१) प्रशासन व संरक्षण (०१) (०१) प्रशासन व संरक्षण | ११- देशांतर्गत प्रवास खर्च | ६९१.८१ | ६२२.६३ | (- ५३२.००) | (- ५२९.६७) |
| | | १४- भाडेपट्टी व कर | ६५.०० | ३९.०० | (+ ५३२.००) | (+ ५२९.६७) |

**२.** पुनर्वितरणाने उपलब्ध करुन दिलेला निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे. त्याच प्रयोजनासाठी त्याचा वापर होत आहे, याची खातरजमा प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी करावी. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

**३.** सदर शासन आदेश, वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ३३/२०२३/व्यय-१०, दि.२७.०१.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-३, अनु. क्र.३, परिच्छेद १६६ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२२१२४४४९१२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SUNIL PANDURANG PANDHARE

Digitally signed by SUNIL PANDURANG PANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7f874792415b92ba519384cacb41b53a89cf93dbd96d4be1f7d97fb6326eed47, pseudonym=E356063E1710100620E953749C8FA6F85E9A154E, serialNumber=8B7DC58E83C9774E4419A7AEEAC77EAE7CDEA272D759DFB29451BCFE7E3F04C9, cn=SUNIL PANDURANG PANDHARE
Date: 2023.02.22 12:48:35 +05'30'

**(सुनिल पांढरे)**
**उप सचिव (वने),**
**महसूल व वन विभाग**

**प्रत :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा.नागपूर.

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) / (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.

४) मुख्य वनसंरक्षक (प्रा.), नागपूर.

५) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर

६) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

७) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.

८) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.

९) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.

१०) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव.

११) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.